**महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तांत्रिक) या संवर्गातील श्री. संदिप देवराम तिदमे, मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, निफाड, जि. नाशिक यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन आदेश क्रमांक : परिवी- २०२२/प्र.क्र.१२३/व्यशि-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुख्य इमारत,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४ मे, २०२३

वाचा :- (१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र: परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९/०२/२०१६

(२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन आदेश क्र. व्यशिअ-२०१६/प्र.क्र. (२१७/१६)/ व्यशि-१, दि. ३१/०७/२०१७

(३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दि.०५/०५/२०२२ चे पत्र

**प्रस्तावना :-**

कौशल्य, रोजगार , उद्योजकता व नाविन्यता विभागाच्या अधिपत्याखालील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयातील महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां.) संवर्गातील श्री. संदिप देवराम तिदमे, मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, निफाड, जि. नाशिक यांची दोन वर्षांच्या परिवीक्षाधीन कालावधीकरिता या विभागाच्या संदर्भ क्र. (२) येथील शासन आदेशान्वये प्रथम नियुक्ती करण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (तां.) या संवर्गातील श्री. संदिप देवराम तिदमे, मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, निफाड, जि. नाशिक यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा गट - ब (तां) या संवर्गातील श्री. संदिप देवराम तिदमे, मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, निफाड, जि. नाशिक यांनी परिवीक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केल्या असल्याने त्यांचा परिवीक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील पुढील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक पाच येथे नमूद दिनांकास समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्रमांक सहामध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | रुजू दिनांक | परिविक्षाधिन कालावधी पुढे ढकलण्याची कारणे | परिविक्षाधिन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. संदिप देवराम तिदमे, मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, निफाड, जि. नाशिक | २५/०९/२०१८ | निरंक | २४/०९/२०२० | २५/०९/२०२० |

संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कळविण्यात येते की, श्री. तिदमे यांच्या पुढील वेतनवाढी मुक्त करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार तात्काळ उचित कार्यवाही करावी.

३. सदर शासन आदेश सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६ मधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/ प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०४१२०१०२५७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2023.05.04 12:07:41 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
३. महालेखापाल, (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
४. सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, नाशिक / औरंगाबाद /मुंबई.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. संबंधित अधिकारी.
७. निवडनस्ती (व्यशि-१).